आणखी सर्व पंडितांच्या किंवा शास्त्रजिज्ञासूंच्या हातून मोठ्या मोठ्या कल्पना शोधून काढणें कधींहि होत नाहीं; परंतु ह्या कल्पना काय आहेत हें समजून घेणें व त्यांस प्रगल्भ दशेस नेण्यास झटणें असा सर्व शास्त्रजिज्ञासूंचा धर्म आहे, म्हणून जी जी गोष्ट शास्त्रजिज्ञासूंस अढळेल तिचें तिचें अर्थपरिस्फोटन त्यांनीं केलेंच पाहिजे. मिल्लनामें कोणी नैयायिक इंग्लंड देशांत होऊन गेला, व त्यानें "धनविषयक व्यवस्था" या विषयावर ग्रंथ केला. वाक्यार्थमीमांसेची शक्ति ह्या ग्रंथकाराचे अंगीं होती म्हणून एवढें काम त्याच्या हातून झालें. जेव्हां जेव्हां त्याला एखादा मोठा सिद्धांत अढळे तेव्हां तेव्हां मोठ्या श्रमानें व बारीक नजरेनें तो त्याची वाक्यार्थमीमांसा करण्यास श्रम करी व जितक्या निरनिराळ्या तऱ्हेनें त्याच्या हातून होईल तितक्या निरनिराळ्या तऱ्हेनें सिद्धांतांचे तो आलोचन करी, व सिद्धांताच्या निरनिराळ्या संबंधांकडे लक्ष देऊन त्या सिद्धांताचें परीक्षण करी.

ज्या लोकांस ज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छा आहे त्यांनींहि वाक्यार्थमीमांसा अवश्य पाहिली पाहिजे. विशेष अध्ययनयोग्य कोणतेंही पुस्तक सहज समजत नाहीं. त्यांत ज्या ज्या कोटींची परीक्षा केली असते, त्या त्या कोटींचा जपून व व्यवस्थेनें वाक्यार्थ झाला पाहिजे. वाक्यार्थमीमांसेचे नियम योजले पाहिजेत. एकाच ग्रंथकारानें जीं निरनिराळीं वर्णनें केलीं आहेत, तीं एका ठिकाणीं जुळलीं पाहिजेत. व विषयपरीक्षणाच्या निरनिराळ्या प्रसंगीं जीं अनुमानें त्यानें काढलीं आहेत तीं नीट पडताळून पाहिलीं पाहिजेत. व त्याच्या सिद्धांताच्या सर्व आकाराची स्पष्ट दृढ परीक्षा झाली पाहिजे.

वाक्यार्थमीमांसा काय हें प्रापंचिक जनानींहि समजून घेणें अवश्य आहे. यास दृष्टांत. पहा, एखादा दस्तऐवज फार जपून तयार झाला, परंतु त्या दस्तऐवजावरून आपला कोणताहि हक्क शाबित करते वेळीं त्या कागदाचा अर्थ करावा लागतो. त्या अर्थाची योग्यता मोठी आहे. न्यायाधीशापुढें त्या कागदांतील वाक्यार्थाविषयीं मोठे मुद्दे निघतात, व ज्या ज्या प्रकारचा अर्थ शाबित होईल, त्या त्या प्रकारें कोडताचे मोठमोठे ठराव फिरतात. यावरून जैमिनीच्या मीमांसादर्शनाची

योग्यता मोठी आहे असें आम्हांस वाटतें. कारण, विद्याध्ययनाचें ती एक साधनच आहे, व हिंदुस्थानच्या इतिहाससंबंधानें तिचें माहात्म्य मोठें आहे. ही मीमांसा सर्व श्रौतधर्माचें भांडारच आहे व पुणेंकर रघुनाथ शास्त्री पर्वते आणि काशीकर राजाराम शास्त्री कालेकर ह्यांसारखे गुरु ज्या रीतीनें वादविवाद करीत, त्या रीतीचें मुख्य साधन मीमांसाच आहे. वेद, आरण्यकें, कल्पसूत्रें, पतंजलीचें महाभाष्य, किंवा माधवाचें वेदभाष्य, अशा विद्यामंदिराचें कुलूप काढण्याची ती जणों किल्लीच आहे. तार्किकांचे आणि धार्मिकांचे जे सिद्धांत आहेत, व हल्लीं हिंदु लोकांमध्यें ज्या सिद्धांतांची प्रवृत्ति आहे, त्यांचें ती उत्पत्तिस्थान आहे, म्हणून जैमिनीची मीमांसा सर्व प्रकारें विशेष अवलोकनीय आहे. षड्दर्शनचिंतनिकेच्या प्रारंभीं आमचें मुख्य काम जैमिनिकृत मीमांसेचें भाषांतर करण्याचें व त्याचें तात्पर्य निरूपण करण्याचें आहे. त्याचा आरंभ करण्या पूर्वीं भरतखंडांतील वाक्यार्थमीमांसेचा संक्षेपतः इतिहासवर्णन करतों.

वाक्यार्थमीमांसेचा विषय—सर्वमान्य मूलग्रंथ.

वाक्यार्थमीमांसेची योजना करण्यापूर्वीं कांहीं सर्वमान्य ग्रंथ गृहीत केले पाहिजेत. हे गृहीत मूलग्रंथ ऋषिप्रणीत वेदसंहिता होत. आतां, ऋषिजन हे मोठे प्रबळ विचारी होते. ध्याननिमग्न होऊन ते ईश्वराची प्रार्थना करीत, आणि सामगान करीत. त्यांच्या प्रार्थनेमध्यें आणि गानामध्यें गहन धार्मिक विचार असत. त्यांचें मन भक्तिभावानें सद्गदित होत असे, आणि संसारामध्यें सर्व प्रसंगीं ते ईश्वराचें साहाय्य मागीत. मनुष्याच्या मनांतील पापबुद्धीमध्यें आणि पुण्यबुद्धीमध्यें जो सतत झगडा चालला आहे त्याविषयींचें ज्ञान त्यांस उत्तम असे. व सद्गदित हृदयानें ते ईश्वराचा धावा करीत, कीं "हे ईश्वरा! आमची पुण्यबुद्धि प्रबळ कर, आणि पापबुद्धीचा पराजय करून पुण्यबुद्धीला जय दे." ईश्वर एकच होता असें ते मानीत. तेणेंकरून त्यांच्या मनास स्फुरण चढत असे. आत्मा अनश्वर आहे असें त्यांचें मत असे. व पूर्वज ज्या सुकृतपथानें गेले, त्या सुकृतपथाचें मोठ्या आल्हादानें ते वर्णन करीत. त्यांचें स्वर्गवर्णन मोठें शुद्ध असून अंतःकरणास सद्गदित करणारें आहे

हे ऋषिजन या भरतखंडांतील शुद्ध सिद्धांताचें मूलप्रतिपादक होत. तो शुद्ध सिद्धांत कसा म्हणाल, तर परमेश्वराच्या ठायीं निरंतर वास करणारा. हा शुद्ध सिद्धांत ऋषींच्या दृष्टीस पडला आणि त्यापासून जगतांत प्रकट झाला. अशा प्रकारचे ऋषिजन भरतखंडांतील लोकांच्या मनाचें प्रवर्तन अजून करतात. कारण कीं, आपल्या मतांचें उत्पत्तिस्थान ऋषिजनच असें षड्दर्शनकार मानतात, व त्याप्रमाणें त्यांची योग्यता आहे असें समजतात. ही गोष्ट भरतखंडांत इतकी गृहीत झाली आहे, कीं लोकमान्य पण ऋषिविरुद्ध अशाहि गोष्टी ऋषिप्रणीत आहेत असें लोक मानतात; आणि आपली सिद्धांतसरणि स्थापित करण्याकरितां ऋषींनें उच्चारिलेलें भलतीकडील एखाद्या वचनाचें प्रतिपादन करतात. या कारणामुळें भरतखंडामध्यें वाक्यार्थमीमांसा विशेष प्रगल्भ दशेस पोंचली आहे.

आधिभौतिक वाक्यार्थमीमांसा.

ब्राह्मणनामें ग्रंथकार ऋषिजनांच्या मागून झाले. त्यांनीं प्रथमच वाक्यार्थमीमांसेची योजना केली. आपणास ते ब्रह्मवादी असें बहुधा म्हणवीत असत. ब्रह्मशब्दाचा अर्थ संचितविद्या असें ते समजत. ऋषिजनांचा ब्रह्मशब्दाचा अर्थ ईश्वराची प्रार्थना अथवा ईश्वरपर गान असा असे. पुष्कळ दिवसपर्यंत प्राचीन जनांची बुद्धि सद्गदित होत असे, आणि त्यांच्या चित्तवृत्तीस स्फुरण चढत असे, एवढी ब्रह्मशब्दाची शक्ति असे, म्हणून प्रसंगानुराधानें श्रौतकर्मसंबंधी सिद्धांताचें प्रतिपादन करण्याकरतां ऋषिप्रणीत मंत्रांचे अर्थ करून ब्रह्मवाद्यांनीं आपलें मत स्थापन केलें त्यांच्या वाक्यार्थसरणीस आधिभौतिक वाक्यार्थमीमांसा असें नांव दिलें आहे; कारण मंत्राचा अर्थ करतांना त्यांत कांहीं तरी श्रौतकर्म आहे असें त्यास वाटे; आणि सूर्यभ्रमणासारख्या एखाद्या स्वाभाविक सृष्टिस्वरूपाचें कथन करून, अथवा लोकांच्या एखाद्या चालीचें वर्णन करून, अथवा सर्वमान्य विधींतील कांहीं गोष्टींचें अवलंबन करून ते वाक्यार्थ करीत. बाह्य जगताच्या आकारावरून त्याचे सर्व दृष्टांत बसविलेले असत, व असे दृष्टांत देण्यांतच काय तो त्यांचा मुख्य बाणा. ब्राह्मणनामें कोणताहि ग्रंथ घेतला असतां श्रौतकर्माच्या अनुरोधानें ऋषिप्रणीत मंत्रांचा अर्थ त्यांत आढळतो. ऐतरेय, तैत्तिरीय, किंवा शतपथ ब्राह्मण

यांतील कोणताहि अध्याय पाहिला असतां त्यांची वाक्यार्थमीमांसासरणि लक्षांत येईल. परंतु तीन गोष्टी विशेष लक्षांत बाळगल्या पाहिजेत. प्रथम, ते निरुक्तविचार फार करीत. दुसरी, पूर्वी काष्ठमंथनानें अग्नि ब्रह्मवादी उत्पन्न करीत म्हणून यज्ञकर्मी प्राणोत्पत्तीचे प्रकार आहेत असें त्यांस वाटे. तिसरी, देव आणि दैत्य यांतील युद्धकथांनें [illegible] वर्णन करीत. आधिभौतिक वाक्यार्थमीमांसेच्या संबंधानें, निरुक्त हा त्या मीमांसेचा अध्यात्म आकार आहे. सृष्टिस्वरूप हा तिचा भौतिक आकार आहे आणि कथा हा तिचा ऐतिहासिक आकार आहे. प्रत्येक शास्त्राचे हे तीन आकार असतात हें सांगणें नको. या आधिभौतिक वाक्यार्थमीमांसेमध्यें पंडितजन पिढ्यांच्या पिढ्या निमग्न झाले होते. आपल्या श्रौतसिद्धांतांचें प्रतिपादन करून ते लयास गेले.

आध्यात्मिक वाक्यार्थमीमांसा.

या आधिभौतिक वाक्यार्थमीमांसेचा ब्रह्मवादिजनांना सहजच कंटाळा आला. श्रौतसिद्धांत इतके ऐहिक वाटत कीं, त्यांचें प्राबल्य चालेना म्हणून ब्रह्मवादिजन जाऊन त्यांच्या ठिकाणीं दुसरे पंडित झाले. ते आरण्यकें ज्या वेळीं झालीं त्या वेळचे आचार्य होत. आतां वाक्यार्थमीमांसेची पद्धति बदलली. आध्यात्मिक रीतीनें मुळमंत्राचा अर्थ होऊं लागला. जेणेंकरून पंडितांस नेहमी स्फुरण येतें अशा आत्मिक स्वरूपाकडे लक्ष जाऊं लागलें. आत्मा, मनाच्या शक्ति, आणि चैतन्य, यांविषयीं वादविवाद व विचार होऊं लागले. जडसृष्टिस्वरूपाच्या विचारांनीं आत्मिक विचाराकरितां मार्ग तयार करून ठेवला होताच. पदार्थांच्या गुणांचें विवेचन होऊं लागलें. या वाक्यार्थमीमांसेचें मुख्य स्वरूप हें असें कीं, जें जें कांहीं आहे त्याचें तत्व कोणास न जुमानतां उत्कंठेनें शोधून काढायाचें. आतां ब्रह्म म्हणजे प्रार्थना किंवा संचितज्ञान हा अर्थ नष्ट झाला. त्या शब्दाचें अर्थांतर झालें, व मूलतत्व असा त्याचा अर्थ झाला. ग्रीक लोकांमध्यें सर्व पदार्थांचें तत्व शोधण्याची आवड एक वेळीं माजली होती; आणि सर्व अध्यात्मविचारांमध्यें तिची प्रवृत्ति झाली. मग ग्रीकहि तत्व काय असा शोध फार करीत. परंतु त्यांची पद्धति भिन्न असे ते अग्नि किंवा वायु असा एखादा पदार्थ घेत, आणि सर्व जडसृष्टि त्याचा

आकार आहे, असें सिद्ध करीत. त्यांचे तार्किक सिद्धांतहि स्वतांचेच असत. आणि जें जें त्यांना दिसे तें तें एकाच वस्तूचे निरानिराळे आकार आहेत असें समजून, ते त्या आकारांची उपपत्ति शोधण्यास लागत. भरतखंडांतील प्राचीन आर्य कांहीं ऋषिप्रणीत वचनें घेत, आणि जडाचें आणि चैतन्याचें तत्व काय हें त्या वचनांच्या अर्थावरून बसवीत. ग्रीक लोक हे सृष्ट जड पदार्थांचें विवेचन करीत. परंतु गुण अथवा शक्ति अथवा अनुगत तत्वें ह्यांचा विचार भरतखंडांतील प्राचीन आर्य करीत. ग्रीक ज्या स्थितींत होते तिच्यामुळें सहजच त्यांना पदार्थांच्या दृश्य गुणांचा विचार करावा लागे; आणि साधर्म्यवैधर्म्यांवरून आपलें अनुमान सिद्ध करावें लागे. भारतखंडीय प्राचीन आर्य लोक फक्त सोपपत्तिक तत्वविचार करीत. ग्रीक लोकांच्या विचारांपासून सृष्टपदार्थविज्ञान उत्पन्न झालें; आणि प्राचीन आर्यांचे विचार अति सूक्ष्म व गहन असत. तेणेंकरून त्यांच्या मनांची धांव मोठी असे. ही धांव तरी कशी म्हणाल तर सर्व संसाराचा ते त्याग करीत आणि पारमार्थिक चिरंतन शांति आणि सुख ह्यांचा आकार जणों त्यानां मूर्तिमंत दिसे, आणि ते आत्मिक संसारांत गढून जात. हळू हळू ग्रीक लोक जड सृष्टि आणि चैतन्य, यांच्या धर्मांचा विचार करूं लागले आणि जरी वारंवार त्यांचे श्रम व्यर्थ जात व त्यांची मति गुंग होई तथापि त्यांनीं पदार्थांचें सोपपत्तिक कार्यकारणभाव जाणण्याचा क्रम चालू ठेवला. ज्या तत्वज्ञानाचे योगेंकरून शांति आणि सुख प्राप्त होतें तें तत्व जाणण्याविषयीं भरतखंडांतील प्राचीन आर्य झटत. त्यापासून ध्यानमार्ग म्हणजे ह्याचा उद्देश व त्याचीं साधनें दाखविणारें योगशास्त्र उत्पन्न झालें. इकडे कांहीं आचार्य ध्यानमार्गांत निमग्न झाले असतां दुसऱ्या कांहीं आचार्यांनीं व्याकरणादि शास्त्रांवर श्रम केले. या श्रमांच्या योगानें त्याच वेळीं व त्यामागून अध्यात्म विचाराच्या निरनिराळ्या प्रकारची मोठी गर्दी उडाली. ज्यांचें नांव ऐतिहासिक असे कांहीं पंडित उत्पन्न झाले, व ते ऋषिप्रणीत वचनांचा अर्थ आपल्याच रीतीनें लावून आपलेच कांहीं सिद्धांत प्रतिपादन करूं लागले. दुसरे कांहीं पंडित निघाले त्यांनीं भाषेच्या परिस्फोटनाविषयीं विचार करून मूळमंत्राचे अर्थ करण्याची आपलीच प्रवृत्ति चाल-

विली. त्या पंडितजनांत दोन प्रकार असत. एक वैयाकरण, दुसरे नैरुक्त. कांहीं आचार्यांनीं श्रौतकर्माच्या मीमांसेकडे लक्ष दिलें. हे स्वतांस याज्ञिक म्हणवीत. होहि मूळमंत्राचा अर्थ आपल्या तऱ्हेनें करीत. स्थलसंकोचामुळें आचार्यांनीं केलेल्या निरनिराळ्या उद्योगाचें निरूपण येथें करवत नाहीं. परंतु त्यांनीं वाक्यार्थमीमांसेची योजना करून ती प्रगल्भ दशेस आणिली, इतकें म्हणणें पुरें आहे. या आचार्यांनीं असा झटून उद्योग केला कीं, तेणेंकरून वाक्यार्थमीमांसा हें शास्त्र रूपास आलें.

वाक्यार्थमीमांसकाविषयीं उदाहरण.

आधिभौतिक वाक्यार्थमीमांसादिप्रकरणाचें जें आम्हीं विवेचन केलें आहे, त्याचें दृष्टांतानें थोडें निरूपण करणें अवश्य आहे. ऋग्वेदसंहितेतील प्रथम मंडळाचें १६४ वे सूक्तांतील ४५ वे मंत्राचा विचार करूं या.

**चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुर्ब्राम्हणा ये मनीषिणः ॥**
**गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥**

या ऋचेचें भाषांतर मराठींत केलें आहे तें असें—

**॥ पदें वाचेचीं नियमित चार ॥ जाणती तीं थोर ब्राम्हण ज्ञाते ॥**
**॥ हृदयीं ठेविली तीन न जाणती, ॥ मनुष्यें बोलती चवथें मात्र ॥**

“ नेङ्गयंति ” या पदाचे अर्थाविषयीं माधवाचें व आमचें मत भिन्न पडतें. या भेदाचीं कारणें अशीं आहेत कीं, “ नेंगयंति ” याचा चेष्टा असा अर्थ केला असतां वाक्यभेदरूप दोष येतो. दुसरें, या ऋचेंतील स्वारस्यहानि होते. तिसरें, अन्वय बिकट होतो; चवथें, मनुष्यें आणि मनीषण ब्राम्हण यामध्यें विरुद्धोपन्यास आहे तो दुर्बल होतो.

आतां या ऋचेचा अर्थ निरनिराळे आचार्य निरनिराळ्या रीतीनें करितात. वेदवादी म्हणतात कीं, चार पदें म्हणजे “ भूर्, भुवः, स्वः, ” या तीन व्याहृति आणि “ ओं ” हा प्रणव. ब्रह्मवादी आधिभौतिक वाक्यार्थमीमांसेच्या साहाय्यानें असें म्हणतात कीं, “ चार प्रकारची वाणी उत्पन्न

झाली. तिचे तीन प्रकार या तीन लोकीं अढळतात, व चवथा प्रकार पशूंत आहे. भूलोकांवर प्रथम प्रकार अग्नि आणि रथंतरसाम ह्यांमध्यें अढळतो. दुसरा प्रकार अंतरिक्षामध्यें आणि वामदेव्यसामामध्यें अढळतो. तिसरा प्रकार द्युलोकीं असून सविता आणि बृहत्साम यामध्यें अढळतो. चवथा प्रकार विद्युतेमध्यें आणि पशूंमध्यें आहे. आणि याशिवाय जी वाणी राहिली ती ब्राम्हणामध्यें आली, म्हणून मनुष्यांची आणि देवांची वाणी ब्राम्हण बोलतात." प्रकृत ऋचेचा हा अर्थ ब्राम्हणग्रंथांत दिला आहे. तो श्रौतकर्मव्यवस्थेच्या अनुरोधानें बसविला आहे. ऐतिहासिकपंडित ह्याच ऋचेचा अर्थ असा करितात कीं, "सापांची वाणी, पक्ष्यांची वाणी, क्षुद्र जीवजंतूंची वाणी, आणि नित्य मनुष्यें बोलतात ती चवथी व्यावहारिकी वाणी, हीं चार वाणीचीं पदें होत." ऐतिहासिकपंडित कोणत्या पद्धतीवर शास्त्रविचार चालवीत हें त्यांच्या ह्या ऋचेच्या अर्थावरून कळतें. हा अर्थ विशेष लक्षांत ठेवण्याजोगा आहे. वैयाकरणांस वाणीचे चार पाद कोणते म्हणून विचारलें तर ते म्हणतात कीं, "नामें, क्रियापदें, उपसर्ग, आणि निपात, हे आहेत." वाणीचे चार पाद नैरुक्तांच्या मताप्रमाणें म्हटले तर असे आहेत कीं, "ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि मनुष्याची व्यावहारिकी भाषा." याज्ञिकजनांच्या मताप्रमाणें वाणीचे चार पाद हे आहेत कीं, "मंत्र, कल्प, ब्राम्हण आणि मनुष्यांची व्यावहारिकी भाषा." ज्या आचार्यांनीं अध्यात्म वाक्यार्थमीमांसेची विशेष योजना केली त्या आत्मवादी आचार्यांनीं या ऋचेचा अर्थ असा केला आहे कीं. "परा, (म्हणजे अत्युच्च) पश्यन्ती, (म्हणजे पाहणारी) मध्यमा (म्हणजे मध्यें असणारी) आणि वैखरी (म्हणजे विशेष स्वरघटित झालेली) अशी चार प्रकारची वाणी आहे. त्यांत जेव्हां वाणीचा आकार अंतर्यामीं उत्पन्न होतो तेव्हां ती परा; पुढें तो आकार जेव्हां स्पष्ट बनतो तेव्हां तिचें पश्यंती हें रूप होतें. जेव्हां तो आकार बुद्धीमध्यें म्हणजे निश्चय करणाऱ्या मनःशक्तीमध्यें उठतो, आणि उच्चारघटित होतो, तेव्हां तिचें रूप मध्यमा; आणि ताल्वादिस्थानांतून तो उच्चार बाहेर पडला म्हणजे जो वाणीचा आकार होतो त्याचें रूप वैखरी."

आतां ज्या ऋचेचें पूर्वीं आम्हीं शब्दशः भाषांतर केलें आहे

त्या ऋचेच्या खऱ्या अर्थाचा निश्चय वाक्यार्थमीमांसेच्या साहाय्यानें केला पाहिजे, म्हणजे निरनिराळ्या संबंधानें साहचर्यन्यायाची योजना केली पाहिजे. प्रकरणाचे निरनिराळे भेद आहेत त्यांची योजना केली पाहिजे. जैमिनीच्या मीमांसेंत स्थानविषयाचें निरूपण केलें आहे. त्याची योजना केली पाहिजे. आणि लैंगिकन्यायप्रयोगाची योजना केली पाहिजे. आचार्यांनीं मीमांसेचीं तत्वें शेंकडो वर्षें श्रम करून प्रगल्भ दशेस आणिलीं, व जैमिनीनें त्यांची व्यवस्था केली, या तत्वांची जपून योजना केली असतां आम्ही वर्णन केलेल्या मंत्राचा एकच अर्थ होणें अवश्य आहे.

वाक्यार्थमीमांसा-न्याय.

वाक्यार्थमीमांसेची अनुमानपद्धति प्रगल्भदशेस हळू हळू आली. कांहीं पंडित वाक्यार्थ करण्याचे कामीं गुंतले असतां, दुसरे कांहीं पंडित वाक्यार्थमीमांसेच्या सिद्धांताचा शोध लावण्यास प्रवृत्त झाले. पंतजलिकृतमहाभाष्यामध्यें वाक्यार्थमीमांसेचीं प्रधान तत्वें प्रकट केलीं आहेत, व त्यांवर वाद केला आहे, आणि जपून त्यांचें वर्णन केलें आहे. कांहीं शास्त्रीय ग्रंथांची योग्यता सर्वमान्य होऊन त्यांकडे लोकांचें लक्ष लागूं लागलें होतें आणि त्यांच्या लौकिकावरून त्यांच्याविषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न झाली होती. दृष्टांताकरतां पाणिनिकृत अष्टाध्यायी घ्या. गुरुनामक पंडितजन तिचा वाक्यार्थ करण्याविषयीं उद्युक्त झाले. त्यांच्या न्यायपद्धतीचें मुख्य तत्व हें होतें कीं, ज्या ग्रंथकाराच्या वचनांचा अर्थ करावयाचा, त्याच्या वचनांवरूनच अनुमान काढून ते सिद्धांत बनवीत, आणि याच प्रकारें त्याच्या वचनांचा त्यागहि करीत. अंशतः मोठ्या सूक्ष्म रीतीच्या अनुमानांनीं आणि अंशतः लोकरूढीवरून ते कांहीं परिभाषा बसवीत. या न्यायपद्धतीचें माहात्म्य मोठें आहे. पतंजलीचे महाभाष्यांत या न्यायपद्धतीचे मुख्य सिद्धांत अढळतात. या न्यायपद्धतीमध्यें स्वातंत्र्य आणि पारतंत्र्य हे दोन्हीहि गुण एकदम अढळतात, म्हणजे ही न्यायपद्धति सुधारणुकेस व रूढीस एकदम अनुसरे. सर्वमान्य ग्रंथाच्या वचनाचा त्याग करून ती स्वातंत्र्य दाखवी. परंतु ज्या ग्रंथकाराच्या वचनाचा त्याग करायाचा त्याच ग्रंथकाराच्या लेखावरून

अनुमान काढून ती त्याग करण्यास प्रवृत्त होई. म्हणून ह्या न्यायपद्धतीचे अंगीं पारतंत्र्य असे. परीक्षितग्रंथकार चुक्या करतो, असें दाखविल्यानें सुधारणुकेस साहाय्य होत असे, परंतु त्या ग्रंथकाराच्या अनुरोधानें ही न्यायपद्धति स्थापित झाली आहे, असें दाखवून ती रूढीला अनुसरणाऱ्या लोकांचें मन आपल्याकडे ओढून घेत असे. ज्ञापन आणि प्रत्याख्यान हे दोन शब्द आम्हां सर्व जनांस माहित आहेत. त्यावरून ह्या पद्धतीच्या तत्वाचें निरूपण होतें. अशा प्रकारचा विचार करण्याचा लोकांस अभ्यास झाल्यापासून काय परिणाम झाला हें सहजच लक्षांत येईल. बौद्धलोक उत्पन्न झाले. त्यानीं तर्कसाधनें आणि युद्धसामग्री स्वतांचीच काढिली आणि प्राचीन शास्त्रांचा पराजय मांडला.

विचार आणि पद्धतियांचें मन्वंतर.

इतक्यांत आचार्यांनीं जें अध्यापन केलें, तेणेंकरून बुद्धींत वैशद्य उत्पन्न होऊन विचारशक्तीस नवेच अंकूर फुटूं लागले. ज्या स्वातंत्र्यानें ऋषिजनांचीं आणि ब्रह्मवादिजनांचीं वचनें आणि त्यांचे इतिहास ह्या दोहोंसहि गुंडाळून ठेविलें, असें निर्भय स्वातंत्र्य उत्पन्न झालें. आध्यात्मिक वाक्यार्थमीमांसेच्या साहाय्यानें बौद्धाचार्य पुढें सरकले, आणि आपले सिद्धांत प्रतिपादन करण्यामध्यें जी त्यांनीं धैर्यशक्ति दाखविली, तेणेंकरून त्यांच्या वेळच्या पंडितांस चमत्कार वाटला. ते असें म्हणत कीं, मनुष्य आणि त्याच्या शक्ति ह्यांच्या योगानें सृष्टिस्वरूपसंबंधीं सर्व दर्शनांची उपपत्ति होते. त्यांची वादविवाद करण्याची पद्धति व्यवहार व अध्यात्मशास्त्र ह्यांस अनुसरून असे. ते गृहस्थलोकांच्या आचरणाकडे आणि उत्कर्षाकडे विशेष लक्ष देत. हे गृहस्थ केवळ उपासक आहेत असें ते समजत. आणि बौद्ध उपदेशकांच्या आज्ञा पाळणें, त्यांस मान देणें, आणि शुद्धाचरण करणें इतके गृहस्थांचे धर्म आहेत, असें ते मानीत. हा त्यांच्या उपदेशांतील व्यवहारांश होय. बौद्धाचार्य स्वतः सर्व जन्मभर विहारांत राहत. व त्या ठिकाणीं आत्मिक व मोठें तीव्र असें त्यांस आचरण करावें लागत असे; म्हणून आपल्या वादविवादांत आणि व्याख्यानांत अध्यात्मविद्येची योजना करण्याचा त्यांस अभ्यास झाला. ईश्वरप्रणित श्रुति व तिचें माहात्म्य

ते एकीकडे गुंडाळून ठेवीत. ब्राम्हण सर्व जन्मभर जे यज्ञ करीत, आणि ज्या यज्ञांचे योगें सर्व देशभर केव्हां केव्हां उत्साह उत्पन्न होई, त्या यज्ञांची ते निर्भत्सना करीत; कारण श्रौतकर्मांच्या बदलां सोत्पत्तिक व्यावहारिक धर्म ते सांगत. ते शाब्दप्रमाण मानीत नसत. ते फक्त प्रत्यक्ष, अनुमान आणि उपमान, हीं प्रमाणें मानीत. आणि उपमान देखील प्रत्यक्षांत किंवा अनुमानांत ते मोडीत. कारण लैंगिक उपमानामध्यें आणि आधिभौतिक वाक्यार्थमीमांसकांचे उपमानामध्यें भेद आहे. हे मीमांसक अभियज्ञगाथांचा उपयोग करीत. आणि स्थाप्य अनुमान, जनरुढि, आणि श्रौतसिद्धांत, यांमध्यें संबंध काढून त्यावरून उपमानें योजीत.

प्राचीन पद्धति व विचार यांचें उज्जीवन.

उत्तर आचार्यांनीं बौद्ध लोकांशीं विरोध केला, नंतर त्यांवर चाल केली आणि भरतखण्डांतून त्यांना समूळ काढून टाकण्याविषयीं सामग्री सिद्ध केली. येणेंकरून उत्तर आचार्यांमध्यें अध्यात्मविद्येचें मोठें उज्जीवन झालें. या उत्तर आचार्यांच्या ग्रंथांचें विवेचन आम्ही करणार म्हणून प्रसंगवशात् त्यांच्याविषयीं आम्हांस पुष्कळ वर्णन करावें लागेल.

अर्वाचीन चालू वाक्यार्थमीमांसापद्धति.

अलीकडे जिची योजना आमचे शास्त्री करितात त्या अर्वाचीन वाक्यार्थमीमांसेचें निरूपण केल्यावांचून ही प्रस्तावना पुरी करितां येत नाहीं. ह्या अर्वाचीन वाक्यार्थमीमांसेचा मुख्य सिद्धांत असा आहे कीं, ज्या ज्या सध्यां लोकांमध्यें रीति भाती चालू आहेत त्या सर्व योग्य आहेत, आणि त्यांचें प्रतिपादन करण्याकरितां निरानिराळ्या वाक्यार्थमीमांसकांचे सिद्धांत ते गोंधळून टाकतात. ही पद्धति शंकराचार्यांचे वेळीं उत्पन्न झाली आणि त्यांच्या शिष्यवर्गांनीं कांहीं कालपर्यंत मोठें सामर्थ्य प्रकट केलें. लैंगिक अनुमानाचे दोन भेद आहेत. एक प्रकार असा कीं, प्रमाण म्हणजे काय याचा शोध करून सत्याचा निश्चय करणें आहे. आणि दुसरा गृहीत व मान्य ग्रंथांचा वाक्यार्थ करणें आहे. या दोन्ही भेदांचा बहुधा गोंधळ होतो. या पंडितांचा मुख्य व्यावर्तक गुण काय आहे? हजारों वर्षेपर्यंत भरतखंडांतील प्राचीन आर्यांनीं जो

विद्या प्रगल्भ दशेस आणली, त्या विद्येभर विस्तृत झालेलीं जीं जीं वचनें अढळतात, त्या सर्व वचनांची एकवाक्यता करण्याकरितां व्यवस्था करणें हा होय. परंतु आतां विशेष संशोधन करण्याचा आग्रह लोकांमध्यें आहे, किंवा निदान असावा तरी, आणि सार्वजनिक उन्नति व्हावी म्हणून लोकांच्या मनाची धांवहि मोठी आहे. याकरितां आमच्या पूर्वजांची जी लैंगिकप्रयोगपद्धति व अध्यात्मविद्या त्यांचा शोध करणें विशेष अवश्य आहे. म्हणून आम्ही ह्या षड्दर्शनचिंतनिकेच्या द्वारा भरतखंडांतील षड्दर्शनांचें भाषांतर आणि तत्वें हीं वाचकांस सादर करितों. त्यांनीं कृपा करावी, अशी आमची विनंति आहे.

षड्दर्शनकार.

जैमिनीच्या मीमांसेमध्यें वाक्यार्थमीमांसेचीं सर्व तत्वें असून त्यांची लापिकाहि आहे म्हणून आम्ही प्रथम जैमिनीची मीमांसा घेतली आहे. भरतखंडांतील सर्व अध्यात्मशास्त्रकारांची पद्धति अशी आहे कीं, ते आपल्या सिद्धांताचें विवेचन करून तत्काळींच आपल्या सिद्धांताची प्रायोगिक लापिका करून दाखवितात. योगशास्त्रामध्यें ध्यानाचें साधन, सिद्धि, व हेतु, ह्यांचें वर्णन केलें आहे. एखाद्या पंडितसभेंत ज्या रीतीनें वादविवाद व्हावयाचा ती वादविवादाची रीति तार्किकप्रबंधासह गौतमाचार्यांनीं पूर्ण वर्णिली आहे. अध्यात्मविद्या, आणि आधिभौतिक विद्या यांचें निरूपण करतांना न्यायप्रयोगाची पद्धति कणादाचार्यांनीं प्रगल्भ दशेस आणिली आहे. आणि जसा डार्विन इंग्लंडदेशीं प्रधान आचार्य होऊन बसला आहे, आणि त्याचे अनुयायी लोक आहेत, त्याप्रमाणेंच कपिलाचार्यांनीं आपल्या ग्रंथांत जगदुत्पत्तीचें विवेचन केलें आहे. चैतन्यच काय तें मुख्य आहे, आणि सृष्टीमध्यें जीं जीं दर्शनें घडतात तीं तीं त्या चैतन्याचे आकार, विकार, प्रकार आणि प्रकटन आहेत, असें सिद्ध करण्यास बादरायणाचार्य प्रवृत्त झाले. आतां बाह्य दृष्ट्या तरी हीं सर्व दर्शनें स्थापित आचारास अनुसरून आहेत, म्हणून या दर्शनांमध्यें वेदाचा अधिकार पूर्ण मानला आहे. आणि त्यांनीं वेदाचा अधिकार मानला आहे, म्हणून त्यांना वाक्यार्थमीमांसेचें अवलंबन करावेंच लागलें. याच कारणास्तव या प्रस्तावनेंतच आम्ही वाक्यार्थमीमांसेच्या इतिहासाचा

बराच विचार केला आहे. इतकी लांब प्रस्तावना लिहिल्याबद्दल आमचे वाचकांनीं आम्हांस क्षमा करावी, अशी विनंति आहे.

**विशेष सूचना.** युरोपी लोकांमध्यें पदार्थविज्ञान म्हणजे आधिभौतिक विचार फार झाला आहे, आणि हा विचारच त्यांच्या उत्कर्षाचें बीज आहे. आधिभौतिक आणि अध्यात्म ज्ञानाचा निकट संबंध आहे; आणि या दोन्हींविषयीं षड्दर्शनांत विशेष सिद्धांत आहेत. या सिद्धांतांचें विवेचन करतांना प्रसंगवशात् युरोपी लोकांच्या आधिभौतिक आणि आध्यात्मिक सिद्धांतांचा उपन्यास यथाशक्ति करूं; आणि हा उपन्यास युरोपी लोकांचें ज्ञान आपल्या देशांत येण्यास साधनीभूत व्हावा अशी निदान आमची इच्छा तरी आहे.

**ग्रंथकर्ता.**

षड्दर्शनचिंतनिका–आफिस, पुणें,
१ जानेवारी, १८७७.



# ॥ मीमांसादर्शनम् ॥

( मूलपदानुवृत्तिसहितम्. )

सूत्राणि.

॥ अथातो धर्मजिज्ञासा ॥ १ ॥

**पदानि** । अथ, अतः, धर्म-जिज्ञासा ॥

**पदार्थः** । अथ=अनन्तरं । अतः=एतस्मात् कारणात् । धर्मजिज्ञासा= धर्मस्य जिज्ञासा (धर्माय जिज्ञासेति शबरः) । जिज्ञासा=ज्ञातुमिच्छा ॥

**वाक्यार्थः** । अनन्तरमेतस्मात् कारणात् धर्मस्य ज्ञातुमिच्छा ॥

**भावार्थः** । वेदाध्ययनानंतरं वेदवाक्यविचारद्वारा धर्मो जिज्ञासितव्यः ॥

प्रथमं ग्रन्थपद्धतिं दर्शयामः ॥ अत्र मूलसूत्रे स्फीतैरक्षरैर्लिखिते पदानि विभज्य पदार्थान् वाक्यार्थं भावार्थं च वर्णयामः। कुण्डलिकया स्पष्टाक्षरैश्च पद्धतिमिमां दर्शयामः ॥ पुनरपि यत्र यत्रानुवृत्तिःक्रियते ॥ तत्र तत्र कुण्डलिकया तां दर्शयिष्यामः ॥

# षड्दर्शनचिंतनिका.

## मीमांसादर्शन.

### १. आतां येथून धर्मविवेचन.

१. षड्दर्शनादिग्रंथांची प्रारंभ करण्याची सरणि एकच आहे. त्यांत प्रारंभीं "अथ" शब्द येतो, व टीकाकारांनीं "अथ" शब्दाच्या अर्थसामर्थ्याचें पुष्कळच विवेचन केलें आहे. कोणी "अथ" शब्द मंगलवाचक आहे असें म्हणतात; व मंगल केल्यावांचून ग्रंथांस आरंभ करूं नये असा सिद्धांत करून मंगलकथन व ग्रंथपरिसमाप्ति यांचा कारणकार्यसंबंध इत्यादि विण्यास व्यवस्था करितात. अशा भानगडींत न पडतां आम्ही 'अथ' शब्दाचा अर्थ 'आतां' असा केला आहे, व 'अथ' शब्दाचें सामर्थ्य फक्त आरंभसूचक आहे, असें आम्हांस वाटतें. "येथून" याहि पदाचें सामर्थ्य अशाच प्रकारचें आहे. या दोन पदांपासून अधिकारी कसा असावा याविषयीं ग्रंथकार अनुमानें काढतात. तशीं अनुमानें काढण्याची गरज आम्हांस वाटत नाहीं. ही गोष्ट स्पष्टच आहे कीं, अधिकारावांचून कोणत्याहि विषयाचें अध्ययन कोणाचेहि हातून होणार नाहीं. पुनः वृत्तिकार जिज्ञासापदाचा यौगिक अर्थ घेतात. असें

## MÎMÂNSÂ-PHILOSOPHY.

### 1. Now then the investigation of duty.

1. All the schools of philosophy begin their investigation in the same manner. The first word is *atha.* The commentators always enlarge on the power of the word *atha.* Some maintain that the word *atha* signifies *auspiciousness*; that it is a rule not to begin a literary or philosophical work without propitiation; that propitiation at the beginning and the completion of the work are connected as cause and effect. We cannot sanction this interpretation of the word. We cannot approve of a disquisition on this sense of the word. We believe it means only *now.* The power of the word *atha* simply consists in showing a beginning. The signification of *atas* is *then* for the same reasons. The commentators infer from the use of these two words what sort of a person is qualified to learn a particular system of philosophy. We do not believe any inference is warranted by these words. It is plain enough that no person can learn anything without some previous preparation and some qualifications. The word *jijnâsâ* is etymologically interpreted. It then

सूत्राणि.

**॥ चोदनालक्षणोऽर्थो धर्मः ॥ २ ॥**

**पदानि ।** चोदना-लक्षणः, अर्थः, धर्मः ॥

**पदार्थः ।** चोदना=यत् प्रवर्तयति तत् । लक्षणं=लक्ष्यते नाम साहचर्य्यं दर्श्यते येन तत् । अर्थः=इतिकर्तव्यता । धर्मः=(लक्षणेन-निरूपितः)

**वाक्यार्थः ।** धर्मो नाम प्रवर्तकलक्षितेतिकर्तव्यता ॥

**भावार्थः ।** यत्र यत्र वेदप्रणीतं प्रवर्तकं वचनमस्ति तत्र तत्र सहचरितेतिकर्तव्यता प्राप्नोति । तस्या नाम धर्मः । पुनः चोदनानिमित्तं धर्मस्य ज्ञानं ॥

---

केल्यानें "जाणण्याची इच्छा" अशी पदें उत्पन्न होऊन कोणाची इच्छा, कशाची इच्छा, कशाकरितां इच्छा, अशी आकांक्षा उत्पन्न होते. मग या आकांक्षेचे साधनानें पुष्कळ विवेचन करावें लागतें. तसें न करितां जिज्ञासा या पदाचा आम्ही रूढयर्थ घेतला आहे.

signifies a desire of knowledge, and affords the means of asking these questions:—whose desire, the desire of what—the desire for what purpose. To answer these questions apparently so natural, much is written. Instead of this, we have used the word *jijnâsâ* in its established acceptation.

**२. (विधिजन्य) भावना नित्य जी इतिकर्तव्यता दाखविते तिचें नांव धर्म.**

१. या सूत्रांत आचार्य धर्मशब्दाचें लक्षण बांधतात. या लक्षणास संस्कृतांत त्यांनीं तीन पदें घातलीं आहेत, तद्वाचक यथार्थ मराठी शब्द नाहींत म्हणून त्यांचें विशेष निरूपण करतों. तीं तीन पदें हीं आहेत कीं "चोदना," "लक्षण," आणि "अर्थ." लक्षण म्हणजे साहचर्य, जसें ज्या ज्या ठिकाणीं धूम आहे त्या त्या ठिकाणीं अग्नि आहेच. अर्थ म्हणजे प्रयोजन, प्रयोजन म्हणजे जें करावयाचें तें. आतां चोदनापदाचा अर्थ विशेष विचारयोग्य आहे. चोदनाशब्द आश्वलायन श्रौतसूत्रांत अढळतो. श्रौतसूत्र (१. ३, १७.) या ठिकाणीं बोलावलेली देवता असा अर्थ आहे. मूळ महागायत्रीमन्त्रामध्यें "चुद्" धातूचा प्रयोग आहे, आणि त्याचा अर्थ "प्रेरणें" असा आहे. प्रेरणें म्हणजे बुद्धि, आणि वृत्ति यांस प्रेरणें. जडाची प्रेरणा होत नाहीं. पुनः या मीमांसेंत वाक्यार्थ करते वेळीं भावना म्हणजे विचार याच्यावर वाक्यांतील सर्व पदांचा अन्वय करावा लागतो. जसें, "तो दान करतो" या स्थळीं "तो" हा कर्ता, "दान" हें कर्म. हीं दोन्ही करणें धातूनें जी भावना उत्पन्न होते तींत आकारीभूत होतात. पुनः भावना उत्पन्न होण्यास कांहीं प्रयोजक पाहिजे हें स्पष्टच आहे. विधिवाक्याचे योगानें भावना उत्पन्न होते. जेव्हां

**2. Duty is a purpose which invariably follows (a conception produced by) a scriptural injunction.**

2. By this aphorism, Jaimini defines *Dharma* or duty. There are three terms in this definition. There are, we believe, no words in English which exactly correspond to them. We will explain the original words. The terms are Chôdanâ, Laksana, and Artha. Laksana means invariable sequence, as wherever there is smoke, there is always fire. Artha means a purpose, that is, a motive or that which is sought. The word Chodanâ is very important. It occurs in the Âshvalâyana Shrouta Sûtra. Vide (I. 3, 17.) It means what is invoked. In the celebrated Gâyatrî-verse repeated every day by every Brâhmana, the verbal root *Chud* is used. It means to move, that is, to move the feelings and the faculties of the mind. A material substance is incapable of being moved in the sense of *Chud*. Again the Mîmânsâ-method of interpreting a proposition consists in connecting every part of the proposition with conception (Bhâvanâ). For example, "He makes a gift" is a proposition of which *he* is the subject and *makes a gift* is the predicate. Of the proposition under examination, the verb *makes* according to this Mîmânsâ is the most important part which when resolved, consists of a conception and action. The action, its agent, its object, its purpose, and its instruments are connected with the conception which forms a part of the predicate. Now the conception *must* have a cause. An

सूत्राणि.

**॥ तस्य निमित्तपरीष्टिः ॥ ३ ॥**

**पदानि ।** तस्य, निमित्त—परीष्टिः ॥

**पदार्थः ।** तस्य (धर्मस्य), निमित्तं=बीजं, परीष्टिः=परीक्षा. निमित्तस्य परीक्षा=निमित्तपरीष्टिः ॥

**वाक्यार्थः ।** धर्मस्य किं बीजमिति परीक्षा कर्तव्या ॥

**भावार्थः ।** एषा सूत्रकारस्य विषयकथनरूपप्रतिज्ञा ॥

जेव्हां भावना उत्पन्न होते तेव्हां तेव्हां कांहीं तरी इतिकर्तव्यता असते. अशा इतिकर्तव्यतेचें नांव धर्म. आतां या ठिकाणीं थोडासा अध्यात्मविचार आहे. तो वैशेषिक शास्त्राचे अनुरोधानें करावयाचा. हत्ती मारायास येतो असें पाहिलें. यापासून हत्तीच्या येण्याचें ज्ञान झालें. त्यापासून चित्तांत दुःख उत्पन्न झालें. दुःखापासून द्वेष उत्पन्न झाला. मग पळून जाण्याविषयीं अंतर्यामीं प्रयत्न होऊन पळून जाण्याची क्रिया घडली. असेंच पुनः अंब्याचें झाड पाहिलें. त्यापासून अंब्याचें ज्ञान झालें. त्यापासून सुख प्राप्त होईल अशी वृत्ति उत्पन्न झाली, मग इच्छा उत्पन्न झाली, मग अंतर्यामीं अंबा मिळविण्याविषयीं प्रयत्न, मग क्रिया; म्हणजे ज्ञान, सुखदुःख, इच्छाद्वेष, आणि प्रयत्न, इतके आकार एकादी क्रिया करते वेळीं चित्तांत होतात. हे सारे आकार एका भावनापदानें समजतात. पुनः पुढें या गोष्टीचा विचार करावा लागेल. इतकें सांगितलें पाहिजे कीं अर्वाचीन हॅमिल्टनासारखे अध्यात्मशास्त्रकर्ते भावनेचें असेंच वर्णन करितात.

original injunction is stated to be the cause. The conception, no matter, what the subject may be, is invariably accompanied by a purpose. *Such a purpose* is *a duty.* We must explain the psychology of this definition, and base it on the principles of Vaisheslka philosophy. Any object presented produces knowledge. Knowledge produces the feeling either of pleasure or pain, followed either by desire or aversion. Then follows the internal effort or volition which results in an action. Hence an action involves knowledge, the feeling of pleasure or pain, desire or aversion, and volition. All these are the elements of conception called Bhâvanâ. We will return to this subject. It may be mentioned by the way that great European thinkers like Sir William Hamilton recognize these elements and their connection as we have stated.

Register No. 131 of 1877.

1499

## सूचना.

| | रुपये. | आणे. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, अगाऊ .. .. .. .. .. .. .. .. | ५ | ० |
| एका अंकास .. .. .. .. .. .. .. .. .. .. .. | ० | ८ |

पुण्याबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दर वर्षाचे ६ आणे खेरीज पडतील. मागाहून वर्गणी घेतली जाणार नाहीं.

ग्रंथकर्त्यास अथवा म्यानेजरास जीं पत्रें लिहावयाचीं, तीं "षड्दर्शनाचिंतनिका-आफिस, पुणें, सदाशिव पेंठ, घर नंबर ६४१" या पत्यावर लिहावीं. वर्गणी वगैरे संबंधी पत्रें याच पत्यावर पाठवावींत.

---

| | Rs. | A. |
|---|---|---|
| For one year, in Advance... ... | 5 | 0 |
| Single copies. . ... ... ... ... ... ... | 0 | 8 |

Besides six annas for postage at the rate of half an anna for a copy.

*N. B.* The subscription is to be paid *in advance.* No accounts of arrears can be kept.

All letters should be addressed to the Manager of the *Saddarshana*-Chintanikâ-Office, Poona, Sadashive Petha, House Municipal No. 641.